अटल महापणन विकास अभियानाच्या द्वितीय वर्षात (२०१७-१८) उत्कृष्ठ काम करण्याऱ्या संस्थांना अटल महापणन पुरस्कार देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## सहकार, पणन व वस्त्रोदयोग विभाग

## शासन निर्णय क्रमांक:- संकीर्ण-२०१९ /प्र.क्र.१८/२४-स

मंत्रालय, मुंबई-३२

दिनांक :- ३० जानेवारी, २०१९

**संदर्भ:-** १) शासन निर्णय, क्रमांक : शिकाना-१२१६ /प्र.क्र. १० /२४-स
सहकार, पणन व वस्त्रोदयोग विभाग, दिनांक २० डिसेंबर, २०१६

२) शासन परिपत्रक, क्रमांक: शिकाना-१२१६ /प्र.क्र. १० /२४-स
सहकार, पणन व वस्त्रोदयोग विभाग, दिनांक ३१ डिसेंबर, २०१६

३) शासन निर्णय, क्रमांक: शिकाना-१२१६ /प्र.क्र. १० /२४-स
सहकार, पणन व वस्त्रोदयोग विभाग, दिनांक १२ एप्रिल, २०१७

४) शासन निर्णय, क्रमांक: सपस-२०१७ /प्र.क्र. २२८ /२४-स
सहकार, पणन व वस्त्रोदयोग विभाग, दिनांक ८ डिसेंबर, २०१७

५) शासन निर्णय, क्रमांक:- संकीर्ण-२०१७ /प्र.क्र.२७३/२४-स,
सहकार, पणन व वस्त्रोदयोग विभाग, दिनांक २६ डिसेंबर, २०१७.

६) शासन निर्णय, क्रमांक-संकीर्ण-२०१७/प्र.क्र.१७१/२४-स
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, दिनांक १८ ऑगस्ट, २०१८.

**प्रस्तावना :-**

राज्यातील सहकारी पणन महासंघ, जिल्हा/तालुका खरेदी-विक्री संघ व विविध कार्यकारी सहकारी सेवा (वि.का.स.) संस्था यांचे कामात सुधारणा करुन त्यांचे बळकटीकरण करण्यासाठी शासन निर्णय, दिनांक २६/१२/२०१७ अन्वये "अटल महापणन विकास अभियान" राबविण्यात आले. सदर शासन निर्णयातील **मुद्दा क्रमांक १०** मध्ये या अभियानात उत्कृष्ठ, नाविन्यपूर्ण काम करणाऱ्या संस्था व व्यक्तींना पुरस्कार देऊन गौरविण्यात येणार असल्याचे नमूद केले आहे. अभियानाच्या द्वितीय वर्षात दिनांक २५/१२/२०१७ ते दिनांक २५/१२/२०१८ या कालावधीत राबविण्यात आलेल्या अभियानांतर्गत उत्कृष्ठ, नाविन्यपूर्ण काम करणाऱ्या संस्था व व्यक्तींना पुरस्कार देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ व त्यांच्या सभासद असलेल्या संस्थांच्या बळकटीकरणासाठी दिनांक २५.१२.२०१७ ते २५.१२.२०१८ या कालावधीत राबविण्यात आलेल्या अटल महापणन विकास अभियानाच्या द्वितीय वर्षात संस्थांनी केलेल्या कामाचे मूल्यमापन करुन, त्या मूल्यमापनाच्या आधारे पणन महासंघ, खरेदी विक्री संघ, वि.का.स. संस्थामधील उत्कृष्ठ संस्था व व्यक्तींना पुरस्कार प्रदान करण्यात येतील. सदर पुरस्कार पुढीलप्रमाणे आहेत:-

**अ) <u>अटल महापणन पुरस्कार:- (२०१७-१८)</u>**

१) **सर्वोत्कृष्ट वि.का.स. संस्था (जिल्ह्यात उत्कृष्ठ):** अभियानाच्या द्वितीय वर्षात दिनांक २६ डिसेंबर, २०१७ च्या शासन निर्णयात नमूद उपक्रमांची व इतर नाविन्यपूर्ण उपक्रमांची अंमलबजावणी करणाऱ्या वि.का.स. संस्थामधून निकषांआधारे उत्कृष्ठ संस्थाची निवड करण्यात येईल व त्यांना रोख रक्कम, स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र असे पुरस्कार देऊन गौरविण्यात येईल. संस्थांची निवड पुढीलप्रमाणे केली जाईल:-

| स्तर | क्रमांक | संस्था |
|---|---|---|
| **जिल्हा (३४)** | प्रथम | ३४ |
| | द्वितीय | ३४ |
| | तृतीय | ३४ |
| **एकूण** | | **१०२** |

२) **सर्वोकृष्ट खरेदी-विक्री संघ (विभागात उत्कृष्ठ) ):** अभियानाच्या द्वितीय वर्षात दिनांक २६ डिसेंबर, २०१७ च्या शासन निर्णयात नमूद उपक्रमांची व इतर नाविण्यपूर्ण उपक्रमांची अंमलबजावणी करणाऱ्या खरेदी-विक्री संघामधून निकषांआधारे उत्कृष्ठ संस्थाची निवड करण्यात येईल व त्यांना रोख रक्कम, स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र असे पुरस्कार देऊन गौरविण्यात येईल. संस्थांची निवड पुढीलप्रमाणे केली जाईल:-

| स्तर | क्रमांक | संस्था |
|---|---|---|
| **विभाग (८)** | प्रथम | ८ |
| | द्वितीय | ८ |
| | तृतीय | ८ |
| **एकूण** | | **२४** |

३) **सर्वोकृष्ठ अधिकारी/कर्मचारी (राज्यात उत्कृष्ठ):** सदर शासन निर्णयान्वये अटल महापणन विकास अभियानाच्या द्वितीय वर्षात उत्कृष्ठ काम करणाऱ्या अधिकारी/कर्मचारी (विभागीय सहनिबंधक,जिल्हा उपनिबंधक,जिल्हा पणन अधिकारी, बिझनेस डेव्हलपमेंट व मार्केटींग मॅनेजर, ॲग्री बिझनेस मार्केटिंग एक्सपर्ट व तालुका उप/सहायक निबंधक) यांच्यामधून उत्कृष्ठ अधिकाऱ्यांची निवड करुन त्यांनादेखील स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र असे पुरस्कार देऊन गौरविण्यात येईल. अधिकाऱ्यांची व कर्मचाऱ्यांची निवड पुढीलप्रमाणे करण्यात येईल:-

| स्तर | गट | क्रमांक | संख्या |
|---|---|---|---|
| **राज्य (१)** | विभागीय सहनिबंधक | प्रथम | १ |
| **राज्य(१)** | जिल्हा उपनिबंधक | प्रथम,द्वितीय,तृतीय | ३ |
| **राज्य(१)** | जिल्हा पणन अधिकारी | प्रथम,द्वितीय,तृतीय | ३ |
| **राज्य(१)** | बिझनेस डेव्हलपमेंट व मार्केटींग मॅनेजर (MCDC) | प्रथम,द्वितीय,तृतीय | ३ |
| **राज्य(१)** | ॲग्री बिझनेस मार्केटिंग एक्सपर्ट (MSAMB) | प्रथम,द्वितीय,तृतीय | ३ |
| **जिल्हा(३४)** | सहाय्यक निबंधक | प्रथम | ३४ |
| **एकूण** | | | ४७ |

**ब) पुरस्कार निवडीचे निकष:-**

अटल महापणन अभियानांतर्गत दिनांक २५ डिसेंबर, २०१७ ते दिनांक २५ डिसेंबर, २०१८ या कालावधीत राबविलेल्या उपक्रमांवर आधारीत पुढील निकषांद्वारे अटल महापणन पुरस्कारांसाठी संस्थांची व व्यक्तींची निवड करण्यात यावी:-

१) कार्यक्षेत्रातील शेतकऱ्यांना वि.का.स.संस्थेचे दिलेले सभासदत्व.

२) थकीत रकमा वसुली,गोदामांच्या पूर्ण क्षमतेचा वापर, शेतमाल तारण योजनेत सहभाग व इतर माध्यमातून उभारलेले खेळते भागभांडवल.

३) शेतकऱ्यांना कृषि निविष्ठा- खते,बियाणे,औषधे, इ. कृषि निविष्ठा आधारित व अन्नधान्य खरेदीचे सुरु केलेले नवीन व्यवसाय

४) कृषि मालाची स्वच्छता, प्रतवारी, पॅकेजींग, लेबलींग, ब्रँडींग व मार्केटिंगचे सुरु केलेले नवीन व्यवसाय.

५) इतर अन्य प्रकारचे (जीवनावश्यक वस्तु) व नाविन्यपूर्ण प्रकारचे सुरु केलेले नवीन व्यवसाय.

६) शेतकरी उत्पादक कंपन्या व महिला स्वयंसहाय्यता गटांचे उत्पादने व सेवा यांची ग्रामीण व शहरी भागात केलेली विक्री व्यवस्था.

७) सर्व प्रकारच्या नवीन व्यवसायामध्ये केलेली गुंतवणूक.

८) सुरु केलेल्या नवीन व्यवसायातून केलेली उलाढाल.

९) या कामी आयोजित केलेल्या कार्यशाळा,बैठका,अभ्यास सहली इ.विविध प्रयत्न.

१०) या कामास विविध प्रसारमाध्यमांद्वारे दिलेली यथोचित प्रसिध्दी व त्यांचे कागदपत्रे इ.

उपरोक्त प्रत्येक निकषाला प्रत्येकी १० गुण देऊन एकूण १०० गुणापैकी जास्तीत जास्त गुण मिळविणाऱ्या संस्थांना/व्यक्तींना पुरस्कार देण्यात येतील.

**क) पुरस्कार निवडीसाठी मूल्यमापन समित्या-:**

दिलेल्या निकषांच्या आधारे तीन प्रकारचे अटल महापणन पुरस्कार २०१७-१८ च्या निवडीसाठी मूल्यमापन समित्या पुढीलप्रमाणे राहतील:-

**१) राज्यस्तरीय मूल्यमापन समिती-**

| | |
|---|---|
| १) सहकार आयुक्त तथा निबंधक,सहकारी संस्था,पुणे- | अध्यक्ष |
| २) व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ,मुंबई | -सदस्य |
| ३) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ,पुणे | -सदस्य |
| ४) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र सहकार विकास महामंडळ, पुणे | -सदस्य |
| ५) पणन संचालक,महाराष्ट्र राज्य,पुणे | -सदस्य सचिव |

या समितीने राज्यातील अटल महापणन विकास अभियानातील द्वितीय वर्षातील (सन २०१७-१८) उत्कृष्ठ अधिकारी/कर्मचारी यांची निवड करुन सदर माहिती महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ, मुंबई व शासनास पाठवायची आहे.

**२) विभागस्तरीय मूल्यमापन समिती:-**

| | |
|---|---|
| १) विभागीय सहनिबंधक,सहकारी संस्था, | अध्यक्ष |
| २) उप सरव्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ,पुणे | -सदस्य |
| ३) महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ,मुंबईचे प्रतिनिधी | -सदस्य |
| ४) महाराष्ट्र सहकार विकास महामंडळ, पुणेचे प्रतिनिधी | -सदस्य |
| ५) विभागीय सहनिबंधक कार्यालयातील उपनिबंधक, | -सदस्य सचिव |

या समितीने विभागातील अटल महापणन विकास अभियानातील द्वितीय वर्षातील (सन २०१७-१८) उत्कृष्ठ प्रथम,द्वितीय,तृतीय क्रमांकाच्या खरेदी -विक्री संघाची निवड करुन सदर माहिती राज्यस्तरावर पाठवायची आहे.

**३) जिल्हास्तरीय मूल्यमापन समिती:-**

| | |
|---|---|
| १) जिल्हा उपनिबंधक,सहकारी संस्था, | अध्यक्ष |
| २) जिल्हा पणन अधिकारी,पणन महासंघ, | -सदस्य |
| ३) महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ,पुणेचे प्रतिनिधी | -सदस्य |
| ४) महाराष्ट्र सहकार विकास महामंडळ, पुणेचे प्रतिनिधी | -सदस्य |
| ५) जिल्हा उपनिबंधक कार्यालयातील सहाय्यक निबंधक, | -सदस्य सचिव |

या समितीने जिल्ह्यातील अटल महापणन विकास अभियानातील द्वितीय वर्षातील (सन २०१७-१८) उत्कृष्ठ प्रथम, द्वितीय, तृतीय क्रमांकाच्या वि.का.स. संस्थांची निवड करुन सदर माहिती राज्यस्तरावर पाठवायची आहे.

**ड) पुरस्कार वितरण कार्यक्रम:-**

अटल महापणन पुरस्कार वितरण कार्यक्रम २०१७-१८ चे आयोजन करण्याची जबाबदारी महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ, मुंबई यांची राहील.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०१३०१४५९२८३९०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Ghadyale Sunanda Mohanrao

Digitally signed by Ghadyale Sunanda Mohanrao
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-operation, Marketing and Textiles, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fd89208cbc27b202c96467165ac5bc9643515d80ba9edecaf650dad6e8311b45, cn=Ghadyale Sunanda Mohanrao
Date: 2019.01.30 15:11:17 +05'30'

**( सुनंदा मो.घड्याळे )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव राजभवन,मलबार हिल मुंबई,

२) मा मुख्यमंत्री याचे अपर मुख्य सचिव,मंत्रालय,मुंबई, मुंबई,

३) मा. मंत्री (सहकार, पणन व वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,

४) सर्व मा.मंत्री,महराष्ट्र राज्य,मुंबई मुंबई,

५) सर्व राज्यमंत्री महाराष्ट्र राज्य,मुंबई, मुंबई,
६) मा. राज्यमंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
७) मा. राज्यमंत्री (पणन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई, मुंबई
८) मा. राज्यमंत्री (वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई, मुंबई
९) मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, मंत्रालय,मुंबई
१०) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई
११) प्रधान सचिव (सहकार), सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय,मुंबई
१२) प्रधान सचिव (पणन), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय,मुंबई
१३) प्रधान सचिव, ग्राम विकास विभाग,मंत्रालय,मुंबई
१४) सचिव,महिला व बाल विकास विभाग,मंत्रालय,मुंबई
१५) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे
१६) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी पणन मंहासंघ, मुंबई
१७) मुख्य कार्यकारी अधिकारी,महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती मिशन,नवी मुंबई
१८) व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडमुंबई
१९) व्यवस्थापकीय संचालक ,विदर्भ सहकारी पणन महासंघ,नागपूर
२०) पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे
२१) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ, पुणे
२२) अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य सहकारी बँक मुंबई
२३) व्यवस्थापकीय, संचालक, महाराष्ट्र सहकार विकास महामंडळ, पुणे.
२४) सर्व विभागीय आयुक्त
२५) सर्व जिल्हाधिकारी
२६) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हापरिषद
२७) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक
२८) सर्व विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था
२९) सर्व प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण प्रकल्प यंत्रणा
३०) सर्व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था.
३१) सर्व जिल्हा समन्वयक,महिला आर्थिक विकास महामंडळ
३२) सर्व जिल्हा पणन अधिकारी, महाराष्ट्र राज्य सहकारी पणन मंहासंघ, मुंबई
३३) सर्व जिल्हा पणन अधिकारी, विदर्भ सहकारी पणन महासंघ,नागपूर
३४) महालेखापाल, महाराष्ट्र-१ /२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरिक्षा ), मुंबई/नागपूर
३५) अधिदान व लेखा अधिकारी ,मुंबई
३६) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
३७) निवडनस्ती.